सॉफटवेअर नुतनीकरण व देखभाल दुरुस्ती व लिंक तयार करण्यासाठीच्या खर्चास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण ८२२५/प्र.क्र.१५९(ई.नं.१०४१०५४)/सां.का.४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २४ मार्च, २०२५

**वाचा :-** १. पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय, क्र. संकीर्ण ८२२४/ प्र.क्र.१४५/सां.का.४, दि. १६ मार्च, २०२४
२. सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र.सां.का.सं./ ११९, दिनांक ०७ जानेवारी, २०२५
३. सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र.सां.का.सं./ ११७४, दिनांक ०५ मार्च, २०२५

**प्रस्तावना :-**

"राजर्षी शाहू महाराज ज्येष्ठ साहित्यिक व कलाकार मानधन सन्मान योजना" राज्य शासनामार्फत सन १९५४-५५ पासून राबविण्यात येते. या योजनेतील लाभार्थी हे संपूर्णपणे कला-साहित्य या क्षेत्राशी निगडीत असून त्यावर त्यांची उपजिविका अवलंबून आहेत. उपर्निर्दिष्ट क्र. १ येथील शासन निर्णयान्वये सदर योजना राबविण्यात येत आहे. त्यानुषंगाने, सबंधिकत लाभार्थ्यांना कलाकार मानधन हे ऑनलाईन पध्दतीने (डीबीटी) हस्तांतर करण्यात येत आहे. लाभार्थ्यांना मानधन हे पोर्टलच्या माध्यमातून अदा केले जाते. सदर पोर्टलच्या नुतनीकरण व देखभाल दुरुस्तीसाठीचा खर्च व कलावंतांचे आधार पडताळणी करण्याकरीता लिंक तयार करणेकरीताचा खर्चास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

पोर्टलच्या नुतनीकरण व देखभाल दुरुस्तीसाठीचा खर्च रुपये १,१८,०००/- व कलावंतांचे आधार पडताळणी करण्याकरीता लिंक तयार करणेकरीताचा खर्च १,६५,२००/- असा एकूण खर्च रुपये २,८३,२००/- ( अक्षरी रुपये दोन लक्ष त्र्याऐंशी हजार दोनशे फक्त) इतक्या रकमेस या शासन निर्णयान्वये प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

०२. सदरचा खर्च मागणी क्र. झेड डी-२, मुख्यलेखाशिर्ष २२०५- कला व संस्कृति-(००) ८०० इतर खर्च (०१) (०१) साहित्य, कला इत्यादि क्षेत्रातील मान्यवर व्यक्तींना आर्थिक सहाय्य (२२०५ १९०१) ५० सहाय्यक अनुदान या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२०२५ या वित्तीय वर्षाकरिता मंजूर करण्यात आलेल्या आर्थिक तरतूदीतून भागविण्यात येईल.

०३. यासाठी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना नियंत्रण अधिकारी तसेच लेखाधिकारी, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

०४. सदर खर्च वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/विनिमय, दिनांक १७ एप्रिल, २०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग-३, अ.क्र. ४ परिच्छेद क्र. २७ (२) (अ) अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त अधिकारानुसार मंजूर करण्यात येत आहे.

०५. सदर प्रकरणी वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि. २५ जुलै, २०२४ व १२ फेब्रुवारी, २०२५ मधील सर्व परिच्छेद परीशिष्टातील अटींनुसार कार्यवाही करण्याची जबाबदारी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई यांची राहील.

०६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२५०३२४१५५६५४३२२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

BALASAHEB ISHWAR SAWANT

Digitally signed by BALASAHEB ISHWAR SAWANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=79fcecc76dd8693a7bfcec682ee63eee2edaf06ba586ac71715d8e6ba4d62fbe, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=327FE83917B9691D96F2C6AEB03B51A86A595CCAC9264923EA4CD090FFD03E83, cn=BALASAHEB ISHWAR SAWANT
Date: 2025.03.24 15:58:24 +05'30'

**( बाळासाहेब ईश्वर सावंत )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१ मा. मंत्री (सांस्कृतिक कार्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२ अपर मुख्य सचिव (सां.का.) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
३ उप सचिव (सां.का.४) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
४ संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, जुने सचिवालय इमारत, पहिला मजला, एम. जी. रोड, मुंबई ४०० ०३२.
५ कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
६ महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता ) - १, महाराष्ट्र राज्य, मुंबई
७ महालेखापाल (लेखापरीक्षा) - १, महाराष्ट्र राज्य, मुंबई
८ महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - २, महाराष्ट्र राज्य, नागपूर
९ महालेखापाल (लेखापरीक्षा) - २, महाराष्ट्र राज्य, नागपूर
१० अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
११ निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१२ निवड नस्ती, सां.का.४